राज्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये, शासकीय दंत महाविद्यालये यामधील पदव्युत्तर अभ्यासक्रमांच्या विद्यार्थ्यांच्या (कनिष्ठ निवासी व वरिष्ठ निवासी) विद्यावेतनात वाढ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः एमईडी १०१५/प्र.क्र.२६२/१५/शिक्षण-२,**
गो.ते.रुग्णालय संकुल, ९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
**दिनांक:- ०२ सप्टेंबर, २०२०**

**संदर्भ:-** १) शासन निर्णय,वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक.एमईडी१०१५/प्र.क्र.२६२/१५/ शिक्षण-२, दिनांक १६/०१/२०१६.

**प्रस्तावना:-**

राज्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, शासकीय दंत महाविद्यालये आणि शासकीय आयुर्वेदिक महाविद्यालयांतील पदव्युत्तर अभ्यासक्रमांच्या विद्यार्थी (कनिष्ठ निवासी व वरिष्ठ निवासी) यांच्या विद्यावेतनामध्ये संदर्भाधीन शासन निर्णयान्वये ऑगस्ट,२०१५ पासून पूर्वलक्षी प्रभावाने दरमहा रुपये ५,०००/- अशी ठोक वाढ करण्यात आली आहे. तसेच, निवासी डॉक्टरांच्या विद्यावेतनात वाढ करण्यासंबंधी दर तीन वर्षांनी आढावा घेण्याचे ठरले होते. त्यानुषंगाने निवासी डॉक्टरांची संघटना 'मार्ड' यांच्याकडून निवासी डॉक्टरांच्या विद्यावेतनाच्या रक्कमेत वाढ करण्याची शासनास विनंती करण्यात आली होती. त्यासंदर्भात निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील शासकीय वैद्यकीय व दंत महाविद्यालयातील पदव्युत्तर अभ्यासक्रमाचे विद्यार्थी (कनिष्ठ निवासी-१/२/३ व वरिष्ठ निवासी-१/२/३) यांचे विद्यावेतनात दिनांक ०१ मे, २०२० पासून प्रतिमाह रुपये १०,०००/- (रुपये दहा हजार फक्त) इतकी ठोक वाढ लागू करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. राज्य शासनाच्या कर्मचाऱ्यांना वेळोवेळी ज्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय राहील, त्याच दराने सदर पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांना महागाई भत्ता अनुज्ञेय राहील.

३. याप्रित्यर्थचा खर्च हा संबंधित संस्थेच्या लेखाशिर्षाखालील **"३४-शिष्यवृत्ती व विद्यावेतने"** या उद्दिष्टाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. २१३/ २०२०/ व्यय-१३, दिनांक १६/०७/२०२० अन्वये दिलेले अभिप्राय विचारात घेऊन आणि मंत्रिमंडळाने दिनांक १२ ऑगस्ट, २०२० रोजी घेतलेल्या निर्णयाच्या आधारे निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२००९०२१२२५०६२४१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURENDRA PRALHAD CHANKAR

Digitally signed by SURENDRA PRALHAD CHANKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=da74ced4daa59e5121be348655e71412ea68827bae27cd8d480eb3963ff77726, cn=SURENDRA PRALHAD CHANKAR
Date: 2020.09.09 17:41:48 +05'30'

**(सुरेन्द्र चानकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राज भवन, मलबार हिल, मुंबई.
मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
मा.राज्यमंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे.
सर्व सहसचिव/उपसचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
संचालक (आरोग्य सेवा), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक.
संचालक, वैद्यकीय शिक्षण व प्रमुख रुग्णालये, बृहन्मुंबईनगरपालिका, मुंबई.
सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय/दंत महाविद्यालये (संचालनालयामार्फत).
महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
महालेखाकार (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
सहसंचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
निवडनस्ती (शिक्षण-२).